विभाग प्रमुख, ट्रॅव्हल्स ॲन्ड टुरिझम , शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ससेनि-३२१८/प्र.क्र.८२/१८/तांशि -७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- ०३ डिसेंबर,२०१८

**संदर्भ :** १) सामान्य प्रशासन विभागाचा अधिसूचना दि.२८ एप्रिल,२०१५ व दि.१५ जून,२०१७.
२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे क्र.१५ (१) (१३७)/७०७/सात, दि.२१ एप्रिल, २०१८ चे पत्र.
३) संचालक तंत्रशिक्षण संचालनालय महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे दि. १३ जून, २०१८ रोजीचा ई-मेल.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन क्र.२ च्या पत्राद्वारे विभागप्रमुख, ट्रॅव्हल्स ॲन्ड टुरिझम, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर शिफारस केलेल्या एकूण ०२ उमेदवारांची त्यांच्या नावासमोर रकाना क्र.०६ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी ते ज्या दिनांकास त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| गुणवत्ता क्र. | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | नियमानुसार वाटप केलेला महसूली विभाग | नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. राजपूत जीवन महादुसिंग | खुला | खुला (महिला) Against | पुणे | शासकीय तंत्रनिकेतन, पुणे. | ------- |
| २ | श्री. विरखरे प्रशांत प्रभाकर | इ.मा.व | खुला | नागपूर | शासकीय तंत्रनिकेतन, नागपूर. | नागपूर येथील वास्तव्याच्या कालावधीतील चारित्र्य पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल सादर करण्याच्या अटीच्या अधिन राहून |

०२. उपरोक्त उमेदवारांना वैद्यकीय मंडळाने वैद्यकीय दृष्टया शासकीय सेवेत पात्र ठरविले आहे तशी नोंद त्यांच्या सेवा पुस्तकात घेण्यात यावी.

०३. गुणवत्ता क्रमांक २ येथील उमेवाराने सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.चारित्र्य-२११७/ प्र.क्र.४८३/२०१७/१६-अ, दि.२८/८/२०१७ नुसार चारित्र्य व पुर्व चारित्र्य पडताळणी प्रमाणपत्र नियुक्ती आदेशापासून सहा महिन्यांच्या आत सादर करणे आवश्यक आहे. उमेदवाराने सादर केलेली माहिती असत्य असल्याचे आढळून आल्यास तात्पुरते नियुक्तीपत्र रद्दबादल करुन भारतीय दंड संहितेनुसार फौजदारी कारवाई तसेच शासन सेवेत कायम स्वरुप अपात्र ठरविण्यात येईल. उर्वरीत उमेदवाराचा चारित्र्य पडताळणी अहवाल व साक्षांकन नमुना पोलीसांकडून प्राप्त झाला असून त्यांच्या विरूद्द कोणताही दंड व शिक्षा असलेबाबतची नोंद आढळून येत नसल्याचे कळविले आहे.

०४. उपरोक्तपैकी जे उमेदवार शासकीय सेवेत कार्यरत आहेत त्यांना गोपनिय अहवाल न पाहता नियुक्ती देण्यात येत आहे. सदर उमेदवारांची गेल्या पाच वर्षातील गोपनिय अहवाल तपासण्याची जबाबदारी त्यांना नियुक्ती देण्यात आलेल्या संस्था प्रमुखांवर सोपविण्यात येत आहे. त्यांचे गोपनीय अहवालामध्ये प्रतिकूल शेरे आढळून आल्यास त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

०५. उपरोक्त उमेदवारांची, विभाग प्रमुख ट्रॅव्हल्स ॲन्ड टुरिझम, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) सदर सर्व उमेदवारांची वेतनश्रेणी रु. ३७,४००-६७,०००/- या पे बँड व उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन निर्णय क्र. एसपीसी-२०१०/(३४/१०)/तांशि-२ दि. २०/०८/२०१० मध्ये नमुद एजीपी मध्ये राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारांचे प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमेदवारांचे परिविक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) सदर सर्व उमेदवारांची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

६) शिफारसपात्र मागासवर्गीय उमेदवाराचे जाती विषयक दावे संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून / संबंधित प्राधिका-याकडून तपासून घेण्यात यावेत.

७) उपरोक्त उमेदवारांपैकी महाराष्ट्र शासनाच्या सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांचे परिवीक्षाधीन काळातील वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली, १९८१ च्या नियम ११ नुसार निश्चित करून महाराष्ट्र नागरी सेवा वेतन नियमावली १९८१ च्या नियम ३९.१ मधील पहिल्या परंतुकानुसार त्यांना परिविक्षाधीन काळात वेतनवाढ अनुज्ञेय राहील व त्यांचे नवीन पदावरील प्रारंभीक वेतन वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३,दि.२३ मार्च, १९९४ मधील तरतुदीनुसार संस्थास्तरावर निश्चित करण्यात यावे.

८) **परिच्छेद ०१ मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी आदेशाच्या दिनांकापासून ०१ महिन्याच्या आत तात्काळ रुजु व्हावे. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/व्ही.आय.पी.६७/प्र.क्र.२०७/कार्य-१२,दि.२८मे, २०१८ नुसार सदर विहित कालावधीत उमेदवार रूजु झाला नाही तर तो नोकरीची संधी गमावेल व त्याच्या नियुक्ती करिता विचार करण्यात येणार नाही. यासाठी उमेदवारांकडून देण्यात येणा-या कोणत्याही कारणांचा/ विनंतीचा विचार केला जाणार नाही.**

९) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि. १८/०८/२००९ मधील तरतुदीनुसार दि.१ नोव्हेंबर,२००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-यांने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि. १ नोव्हेंबर,२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी,

२००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधीत शासकीय कर्मचा-यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि. १८/०८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचा-यास नवीन राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू ठरतील.

१०) सदर उमेदवारांचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

११) उमेदवारांस नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही. तथापी, वरील उमेदवारांपैकी, सध्या शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांना पदग्रहण कालावधी अनुज्ञेय राहील.

१२) सदर उमेदवारांनी नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसुचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

०६. सदर नियुक्ती उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबुन राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्तीनंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवाराची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०७. हे आदेश प्राप्त होताच संबधित उमेदवारांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधित संस्थाप्रमुखाकडे सादर करावा. संस्थाप्रमुखांनी त्याबाबतचा अहवाल संचालकामार्फत शासनास सादर करावा.

०८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०३१५३४३३६९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e862 1e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd78160 02b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2018.12.03 15:45:12 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व संबंधित उमेदवार (नोंदणीकृत डाकेने) (e-mail द्वारे)

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई.
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे).
३. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७. सहसंचालक तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय, पुणे/नागपूर (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत).
८. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, पुणे/नागपूर (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत).

(वरील उमेदवारांना रुजू करुन घेताना त्यांच्या शैक्षणीक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन संस्थाप्रमुखांनी स्वत: खात्री करावी व सदर उमेदवारांना हजर करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा. तसेच संबंधित संस्थाप्रमुखांनी या आदेशातील ज्या उमेदवारांची नियुक्ती अटीच्या अधिन राहुन केली आहे त्या

उमेदवारांकडून विहीत मुदतीत या अटीची पुर्तता करुन घेवून त्याबाबतचा कार्यपूर्तता अहवाल संचालक, तंत्रशिक्षण यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.)

९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत).

११. निवड नस्ती (तांशि-७).